**डॉ.बाळासाहेब सांवत कोकण कृषि विद्यापीठ, दापोली या विद्यापीठाच्या विविध संशोधन क्षेत्रावर संरक्षण भिंत बांधण्यास प्रशासकीय मान्यता देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**

कृषि,पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग,
शासन निर्णय क्रमांक -कृविदा-२०१०/प्र.क्र.१००/८-अे,
मंत्रालय विस्तार, मुंबई ४०० ०३२, दिनांक : ६ सप्टेंबर, २०१०.

संदर्भः- संचालक,(विस्तार शिक्षण व सासावि) महाराष्ट्र कृषि शिक्षण व संशोधन परिषद, पुणे यांचे पत्र क्र.मकृप/वि.शि.२/कृंपण/१७५५/२०१०, दिनांक ८ जुलै, २०१०.

**प्रस्तावना :-**

डॉ.बाळासाहेब सांवत कोकण कृषि विद्यापीठ, दापोली यांच्या विविध संशोधन प्रक्षेत्रावर संशोधित पिकांच्या जाती व इतर महत्वपुर्ण संशोधन करण्यात येते. सदर विद्यापीठाच्या अंतर्गत विविध कृषि महाविद्यालये, कार्यरत आहेत. यांच्या जमीनी विविध शहरात मध्यवर्ती ठिकाणी व अत्यंत महत्वाच्या जागी आहेत. त्यामुळे त्या क्षेत्रावर अतिक्रमणाचा धोका संभवतो. त्याचप्रमाणे भटकणारी जनावरे इ. त्रासामुळे विद्यापीठाव्दारे चालू असलेल्या मौलिक संशोधन कार्यास बाधा निर्माण होत आहे. संरक्षण भिंत बांधल्यामुळे विद्यापीठाचे संरक्षण वाढेल तसेच नुकसान टळू शकेल.

संशोधीत पीकाच्या जाती व इतर महत्वपूर्ण संशोधन व विद्यापीठाच्या मालमतेच्या संरक्षणासाठी विद्यापीठाने एकूण ११ विविध ठिकाणी संरक्षण भिंत बांधण्याचा एकूण रुपये २५०/- लाखाचा प्रस्ताव शासनास सादर केला आहे. सदर प्रस्तावापैकी रु.१० लाखाच्या आतील पांच प्रस्तावाना प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णयः-**

डॉ.बाळासाहेब सांवत कोकण कृषि विद्यापीठ, दापोली या विद्यापीठाच्या विविध संशोधन क्षेत्रावर संरक्षण भिंत बांधण्याच्या रु.३३.४९ लाखाच्या कामांना शासन निर्णय वित्त विभाग क्र.विअप्र १००८/प्र.क्र.७०/२००८ विनियम, दिनांक १५/५/२००९ मधील भाग एक उपविभाग-५, अ.क्र.३ व सार्वजनिक बांधकाम विभाग नियम पुस्तकातील परिशिष्ट क्र.१३४ मधील तरतूदी नुसार प्रशासकीय मान्यता या शासन निर्णयाव्दारे देण्यात येत आहे. सदर मान्यतेचा बाब निहाय तपशिल खाली दिला आहे.

| | |
|---|---|
| **१)** कृषि संशोधन केंद्र, शिरगांव येथे बांधकाम | रु पये ३.४९ लाख |
| २) कृषि संशोधन केंद्र, फोंडाघाट येथे संरक्षण भिंत बांधकाम , | रुपये ५.००लाख |
| ३) सी.बी.एफ. निळेली येथे संरक्षण भिंत बांधकाम | रुपये १०.०० लाख |
| ४) रोपोली येथे आर.सी.सी.संरक्षण भिंत बांधकाम | रुपये ५.०० लाख |
| ५) अे.आर.एस. पालघर येथे आर.सी.सी. सरंक्षण भिंत बांधणे | रुपये १०.०० लाख |
| | ------------------- |
| | एकूण रुपये ३३.४९ लाख |
| | ------------------ |

सदर प्रस्तावास प्रशासकीय मान्यता देण्यात येत असून, वित्तीय मान्यतेचे आदेश स्वतंत्रपणे निर्गमित करण्यात येतील.

या प्रकरणी महाराष्ट्र कृषि विद्यापीठ अधिनियम, १९८३ परिनियम,१९९० आणि लेखासंहिता, १९९१ मधील तरतूदीचा तसेच प्रचलित शासन आदेश/कार्यपध्दतीचा अवलंब करण्यात यावा.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या वेबसाईटवर उपलब्ध करुन देण्यात आला असून त्याचा सांकेतांक क्र. २०१००९०६१४०२३४०० असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवांने ,

( जी. के. राऊत )
उप सचिव, महाराष्ट्र शासन

प्रति,

सदस्य सचिव, महाराष्ट्र कृषि शिक्षण व संशोधन परिषद,सर्व्हे नं.१३२/ब, भांबुर्डा भोसलेनगर, पुणे ४११००७
कुलसचिव, डॉ.बाळासाहेब सांवत कोकण कृषि विद्यापीठ, दापोली ( ३ प्रतीं)
नियंत्रक, डॉ.बाळासाहेब सांवत कोकण कृषि विद्यापीठ, दापोली (५ प्रती )
आयुक्त (कृषि), महाराष्ट्र राज्य, पुणे (३ प्रती )
आयुक्त, दुग्धव्यवसाय महाराष्ट्र राज्य, मुंबई
.आयुक्त, पशुसंवर्धन महाराष्ट्र राज्य. पूणे.
आयुक्त, मत्स्यव्यवसाय महाराष्ट्र राज्य मुंबई.
महालेखापाल, महाराष्ट्र १ (लेखा व अनुज्ञेयता / लेखा परीक्षा), मुंबई (३ प्रती )
जिल्हा कोषागार अधिकारी, रत्नागिरी ( ३ प्रती )
उप मुख्य लेखा परीक्षक, ( वरिष्ठ) स्थानिक निधी लेखा, रत्नागिरी. (३ प्रती )
उप विभागीय कृषि अधिकारी,रत्नागिरी. ( ३ प्रती )
जिल्हा लेखा परीक्षक, स्थानिक निधी लेखा, डॉ.बाळासाहेब सांवत कोकण कृषि विद्यापीठ, दापोली, (३प्रती )
वित्त विभाग (व्यय-१) ( बीयुडी-१२)
अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
अवर सचिव, कार्यासन २-अे, कृषि व पदुम विभाग, मंत्रालय , मुंबई-३२
कक्ष अधिकारी, कार्यासन ६ अे, ७-अे, कृषि व पदुम विभाग,मंत्रालय, मुंबई.